**आपले सरकार सेवा केंद्र प्रकल्पांतर्गत सुधारित हार्डवेअर खरेदीसाठी कॉन्फिगरेशन निश्चित करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २४१९/प्र.क्र.४३ /आसक

बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ
फोर्ट,मुंबई-४००००१
दिनांक: २३ जानेवारी, २०२०.

**वाचा-**

१) १.ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-६, दि. २६ एप्रिल, २०११
२) शासन शुध्दीपत्रक क्र.संग्राम-२०१५/ प्र.क्र.९३/ आपले सरकार कक्ष, दि. १४/१२/२०१७.

**परिपत्रक**

या विभागाच्या शासन निर्णय क्र. व्हीपीएम-२०११/प्र.क्र.६/पंरा-६, दि. २६ एप्रिल, २०११ अन्वये ई-पंचायत प्रकल्पांतर्गत (संग्राम प्रकल्प) पंचायतराज संस्थांच्या कामाचे संगणकीकरण करण्याच्या दृष्टीने हार्डवेअर खरेदीसाठी खालील प्रमाणे कॉन्फिगरेशन ( Configuration) निश्चित करण्यात आले होते.

अ) डेस्कटॉप : Core i५-६५०/४GB DDR/५०० GB/ DVD Writer/ Win ७ Professional & १८.५" TFT/ Anti Virus Software/ Einternet Port/४Xusb Optical mouse Key board/ Rescue & recovery software/ ५ yrs onsite Warranty.

आ) प्रिंटर -कम -स्कॅनर : A४, ८ ppm,१६ mb,RAM ६००x६०० dpi, १२५ sheet Output tray, १५० Sheet input tray, USB Interface & driver Software with ५ years onsite Warranty.

२. उपरोक्त कॉन्फिगरेशनचे सध्या वापरात असलेले हार्डवेअर सद्य: स्थितीत कालबाह्य (outdated) झाल्याने संगणकीकरणाचे काम करणेसाठी सुधारित हार्डवेअरची खरेदी करणे आवश्यक आहे. काही कार्यालयांमध्ये हार्डवेअर नादुरूस्त असून दुरूस्त होऊ शकणार नसल्याने नवीन

हार्डवेअर खरेदी करण्यासाठी Specification मिळण्याबाबत जिल्हा परिषदांकडूनही विचारणा होत आहे.

३. वरीलप्रमाणे बाब विचारात घेऊन त्यानुसार पंचायत राज संस्थांमध्ये कामाचे संगणकीकरण करण्याच्या कामात सुलभता यावी याकरिता सुधारित हार्डवेअर खरेदी करण्यासाठी पुढीलप्रमाणे हार्डवेअर कॉन्फिगरेशन निश्चित करण्यात येत आहे:-

ऑपरेटिंग सिस्टिम- Windows १०, ८, ७ (३२/६४- bits)

हार्डवेअर-

- Processor (CPU) with ३.२ gigahertz (GHz) frequency or above (Intel i३ and above);
- Motherboard; Compatible with Processor;
- A minimum of ४GB of RAM;
- Monitor Resolution १०२४x७६८ or higher;
- A minimum of ५० GB of available free space on the hard disk;
- Keyboard and a Microsoft Mouse or some other compatible pointing device;
- Peripheral Support for Printer and Scanner;
- Sound Card
- Internet Connectivity support.

४. या विभागाच्या शासन शुध्दीपत्रक क्र. संग्राम-२०१५/ प्र.क्र.९३/ आपले सरकार कक्ष, दि.१४/१२/२०१७ अन्वये संगाम प्रकल्पांतर्गत खरेदी करण्यात आलेले हार्डवेअर (संगणक, प्रिंटर कम स्कॅनर, वेब कॅमेरा) यांची ५ वर्षाची ऑनसाईट वॉरंटी (२०१७ पर्यंत वैध ) आहे. त्यानंतर सदरील हार्डवेअर चालू स्थितीत ठेवण्याची जबाबदारी सीएससी-एसपीव्हीची आहे. तसेच ज्या केंद्रामध्ये

हार्डवेअर नादुरूस्त असून दुरूस्त होऊ शकणार नाही, अशा सर्व केंद्रांना हार्डवेअर विना मोबदला बदली करून देण्याची संपूर्ण जबाबदारी सीएससी-एसपीव्हीची राहिल अशी तरतुद करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतीमधील दुरुस्त होऊ न शकणाऱ्या हार्डवेअर ऐवजी शासनाने उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे निश्चित केलेल्या कॉन्फिगरेशनचे हार्डवेअर सीएससी-एसपीव्हीने संबंधित कार्यालयांना उपलब्ध करून द्यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३०११४८३५०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e7350 5a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2020.01.30 14:14:08 +05'30'

**(प्रविण दे. जैन)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व उपसचिव , ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
३. सर्व पंचायत समित्यांचे गटविकास अधिकारी.
४. सर्व ग्रामपंचायतींचे ग्रामसेवक.
५. प्रकल्प सल्लागार, सीएससी-एसपीव्ही, इ-गव्हर्नन्स इंडिया लि.
६. निवड नस्ती (आपले सरकार कक्ष) ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन,फोर्ट,मुंबई-४००००१